राज्य योजना सन २०१५-१६
वनक्षेत्रात पर्यटन स्थळांचा विकास (Forest Park)
अंतर्गत वनीकरणचा चालू बाब प्रस्ताव (२४०६ २२९५)

महाराष्ट्र शासन
महसुल व वन विभाग
**शासन निर्णय क्रंमाक : निसप-२०१५/ प्र.क्र. १२१ /फ- ५**
मंत्रालय, मुंबई -४००० ०३२
दिनांक :- ३ ऑगस्ट, २०१५

वाचा - १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०(१५-१६)/१४६, दिनांक २१.०५.२०१५व दि.२८.०५.२०१५
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५ /प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दि.१७ एप्रिल, २०१५.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी दि.२८.०५.२०१५ व दि.२८.०५.२०१५ चे पत्रान्वये राज्य निसर्ग पर्यटन विकास या योजनेअंतर्गत वनक्षेत्रात पर्यटनस्थळ विकासा कार्यक्रमातंर्गत सन २०१५-१६ करिता औरंगाबाद व नाशिक वनवृत्तातील वनीकरणाच्या बांधिल कामाकरिता रूपये ३३.५० लक्षचा चालु बाब प्रस्ताव सादर केला आहे.

राज्य योजना सन २०१५-१६ करिता निसर्ग पर्यटन / वन क्षेत्राचा विकास (संरक्षित क्षेत्राबाहेर) (२४०६-२२९५) या योजनेअंतर्गत रू. ३५७०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर निधीतुन औरंगाबाद व नाशिक वनवृत्तातील खाली नमुद केलेल्या योजनांकरिता तृतीय व चतुर्थ वर्षिय बांधिल कामाकरिता खालील विवरणपत्रामध्ये नमुद केल्यानुसार उद्दिष्ट निहाय निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | तृतीय वर्षिय बांधिल कामे (हेक्टर) | चतुर्थ वर्षिय बांधिल कामे (हेक्टर) | बांधिल कामाकरिता लागणारी रक्कम (रू.लाखात) |
|---|---|---|---|---|
| **औरंगाबाद वनवृत्त -** | | | | |
| १ | मौजा सारोळा येथील वन पर्यटन स्थळाचा विकास अंतर्गत वनिकरण कार्यक्रम | ३० | ० | रू.२.२१ |
| २ | मौजा सातारा वन पर्यटन अंतर्गत वनिकरण कार्यक्रम | ० | ६० | रू.५.६७ |
| ३ | देवळाई येथील वनक्षेत्रात पर्यटन स्थळाचा विकास अंतर्गत वनिकरण कार्यक्रम | ० | ६० | |
| ४ | म्हैसमाळ येथील वनक्षेत्रात पर्यटन स्थळाचा विकास अंतर्गत वनिकरण कार्यक्रम | ० | २० | |
| ५ | औढा नागनाथ येथील वनक्षेत्रात पर्यटन स्थळाचा विकास अंतर्गत वनिकरण कार्यक्रम | ० | ५० | रू.२५.१७ |
| **नाशिक वनवृत्त -** | | | | |
| ६ | पेमगिरी किल्ला परिसर,नाशिक - (विखुरलेल्या स्वरूपात स्थानिक औषधी / धार्मिक/शोभिंवत/फलझाडे रोपांची लागवड करणे) | ० | १० | रू.०.४५ |
| ७ | एकुण | | | रू.३३.५० |

वरील विवरणपत्रामध्ये नमूद केल्यानुसार पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी तृतीय व चतुर्थ वर्षिय बांधिल काम करण्यासाठी एकुण रू. ३३.५० लक्ष (रू.तेहतीस लाख पन्नास हजार फक्त) इतक्या रक्कमेस खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय वितरीत करण्यात यावा.

(रक्कम लाखात)

| अ.क्र. | उद्दिष्ट | रक्कम |
|---|---|---|
| १ | ०२-मजुरी | रू.१६.७५ |
| २ | २१-पुरवठा व सामग्री | रू.८.३८ |
| ३ | ५०-इतर खर्च | रू.८३७ |
| ४ | एकुण | रू.३३.५० |

१. उपरोक्त खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१५ -१६ या आर्थिक वर्षात पुर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२. प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजुरी आहे याची खात्री करूनच कामे करावीत. कामे करताना वन (संवर्धन) कायदा १९८०,भारतीय वन अधिनियम १९२७ च्या तरतुदींचा भंग होणार नाही याची सुद्धा दक्षता घ्यावी.परिरक्षणाची कामे करताना रोपवनातील जिवंत रोपांची टक्केवारी लक्षात घेऊनच अनुदान खर्ची टाकावे.

३. सदरहू निधी सन २०१५-१६ साठी मागणी क्र.सी- ०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६ -२२९५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

सदरहू शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१५ /प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०३११५२२१८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHAS ANIL N

Digitally signed by DHAS ANIL N
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917247, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DHAS ANIL N
Date: 2015.08.03 11:56:13 +05'30'

(अनिल धस)
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य नागपुर
३) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
४) मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) औरंगाबाद/नाशिक .
५) महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
६) कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७) ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
८) निवड नस्ती (फ-५)